# जातककथा पुस्तक दुसरे

लेखक : धर्मानंद कोसंबी

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

esahity@gmail.com

www.esahity.com

आभार : यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान

http://dharmanandkosambi.com/index.php?option=com_content&view=section&layout=blog&id=10&Itemid=143

या पुस्तकातील चित्रे जगभरातील विविध देशांतील जातक चित्रकथांतून गुगलवरून घेतली आहेत.

# धर्मानंद कोसंबी



महाराष्ट्राने जगाला अनेक विद्वान रत्ने दिली. अशांपैकी एक म्हणजे धर्मानंद कोसंबी. त्यांचा जन्म गोव्यामध्ये १८७६ साली झाला. लहानपणी त्यांना मराठी सोडून इतर कोणतीच भाषा येत नसे. परंतू शिक्षणासाठी त्यांनी घर सोडले आणि आधी पुणे, आणि नंतर उज्जैन, इंदौर, ग्वाल्हेर, प्रयाग, वाराणसी येथे त्यांनी संस्कृत व इंग्रजीचा अभ्यास केला. गृहस्थिती गरिबीची होती. बाहेर पडले तेव्हा प्रवासाच्या खर्चाला कमरेला पैसा नव्हता. टक्केटोणपे खात गुरूच्या शोधात हजारो मैल सापडेल त्या वाहनाने वा पायी प्रवास केला. बहुतेक पायी प्रवास अनवाणीच केला. अनेक वेळा पाय रक्तबंबाळ झाले, पुष्कळ वेळा चण्या-चुरमुऱ्यावरच भूक भागवावी लागली; वा उपाशीच राहावे लागले. पण त्यांनी अभ्यास सोडला नाही. त्यानंतर पाली व अर्धमागधी भाषांचा अभ्यास करत ते नेपाळ, श्रीलंका, ब्रह्मदेश आदी देशांत फ़िरले. या काळात त्यांनी बौद्ध धर्माचा सखोल अभ्यास केला. गौतम बुद्धाचे पहिले सविस्तर चरित्र त्यांनी संशोधन करून प्रथम मराठी आणि नंतर इतर भाषांत लिहिले.

धर्मानंदांना श्रीलंकेतील बौद्ध मठात बौद्ध विद्येचे गुरु भेटले. तिथे त्यांनी भिक्षुदीक्षा घेतली. तेथे पाली भाषा शिकून बौद्ध धर्माच्या ग्रंथांचे सांगोपांग अध्ययन केले. बौद्ध योगाच्या अभ्यासाकरिता दोनदा ब्रह्मदेशात जाऊन आले. जिवावर अनेक आपत्ती आल्या, परंतु बौद्धधर्माच्या विद्येचा ध्यास वाढतच गेला. पाली भाषेत ज्याप्रमाणे बौद्धधर्माचे अफाट साहित्य आहे, तसेच संस्कृतमध्येही आहे. त्या दोन्ही भाषेतील साहित्यांमध्ये या सात वर्षांत धर्मयात्रेत पारंगतता मिळविली. वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंत चतुरस्त्र विद्वत्ता संपादन केली.

नंतर ते कलकत्ता विद्यापीठात प्राध्यापक झाले. त्यानंतर काही वर्षे पुण्याच्या फ़र्ग्युसन कॉलेजमध्ये (लो. टिळक, आगरकर, गोखले यांच्या काळात) शिकवल्यानंतर त्यांना इंग्लंडच्या ऑक्सफ़र्ड विद्यापीठातून शिकवण्याची आग्रहाची विनंती करण्यात आली. तिथे ते विद्यार्थ्यांना पाली, संस्कृत, अर्धमागधी भाषा आणि बौद्ध धर्माचा अभ्यास शिकवत असत. इंग्लंडमधीलच नव्हे तर जगातील सर्व देशांच्या विद्वानांकडून त्यांना फ़ार मोठे मानमरातब मिळाले.

पण हे सर्व मानसन्मान सोडून भारतीय स्वातंत्र्यलढ्यात भाग घेण्यासाठी ते पुन्हा भारतात आले. इथे ते गुजरात विद्यापीठामध्ये विनापगारी शिकवत असत. मीठाच्या सत्याग्रहात भाग घेतल्यामुळे त्यांना सहा वर्षांचा तुरुंगवास भोगावा लागला. या स्वातंत्र्य लढ्याच्या काळातच डॉ बाबासाहेब आंबेडकर यांची त्यांच्याशी ओळख झाली आणि बाबासाहेबांच्या जीवनावर कोसंबींचा अमीट असा ठसा उमटला.

डॉ. कोसंबींनी जैन धर्माचाही अभ्यास केला. आपला मृत्यू जैन मुनींप्रमाणे प्रायोपवेशनाने (उपोषणाने) व्हावा अशी त्यांची इच्छा होती. परंतू म. गांधीजींच्या विनंतीने ते दिवसातून एक चमचा कार्ल्याचा रस घेत. त्यांचे निधन १९४७ साली वर्धा येथे म. गांधीजींच्या आश्रमातच झाले.

बौद्ध धर्म दोन हजार वर्षांपेक्षा अधिक कालपर्यंत निम्म्या मानवी जगात प्रचलित होता. त्याला पुन्हा नवा पाया देण्याचे आवश्यक कार्य धर्मानंदांनी केले आहे. बौद्ध धर्माला या विज्ञाननिष्ठ व बुद्धिवादी नव्या युगाच्या प्रेरणांना अनुरूप स्वरूप देणे आवश्यक होते. अद्‌भुत पौराणिक कथा,

कल्पित प्रसंग, आणि पारलौकिक तत्त्वज्ञान यांची शेकडो पुटे मूळच्या विवेकवादी शुद्ध बौद्ध धर्मावर आणि बुद्धचरित्रावर शतकानुशतके चढलेली होती, त्यामुळे नव्या युगाच्या प्रेरणांशी सुसंगत असे त्याचे स्वरूप राहिलेले नव्हते. परंतु बुद्धचरित्राचे व बौद्ध धर्माचे मूळचे शुद्ध स्वरूप या नव्या युगाच्या प्रेरणांशी सुसंगत असेच आहे, असे ध्यानात आल्यामुळे अनेक आधुनिक पश्चिमी पंडितांनी व विशेषत: धर्मानंदांनी ते स्वरूप यशस्वी रीतीने विवेकबुद्धीने शोधून काढले.

बुद्ध व बौद्ध धर्म ही जागतिक संस्कृतीला मिळालेली अलौकिक सर्वोत्तम देणगी असून ही भारताच्या प्राचीन इतिहासातील एक महान घटना आहे. मानवी संस्कृती शुद्ध नैतिक तत्त्वावर आधारलेली निर्माण करणे, हे आधुनिक मानवाचे परमपवित्र कर्तव्य आहे. हे कर्तव्य बजावण्यात मानवाला अपयश आल्यास विज्ञानाच्या सामर्थ्यावर आधारलेल्या भौतिक संस्कृतीसह मानवजात संपण्याचा धोका उत्पन्न झालेला आहे. म्हणून या जगाला तारण्याकरिता बुद्ध व बौद्ध धर्म यांची गरज आहे याची जाणीव त्यांनी जगाला करून दिली.

आचार्य धर्मानंदांनी बुद्धचरित्र व बौद्धधर्म यांचा वाङ्मयीन पाया घातला, त्या पायावर इमारत उभारायचे कार्य थोर दलित नेते डॉ. बोधिसत्व बाबासाहेब आंबेडकर यांनी सुरू केले. त्यांच्या कार्यास धर्मानंदांचा आधार मिळाला. धर्मानंदांनी लिहून प्रसिद्ध केलेले साहित्य हाच तो आधार होय. विचार हा संस्कृतीचा आधार असतो. धर्मानंदांच्या साहित्यातील विचारांचा गाभा त्रिकालाबाधित व अजरामरही आहे, असे म्हणता येते. डॉ. आंबेडकर यांच्या नव्या आंदोलनाने त्या विचारांना चांगला उजाळा मिळाला. त्या वैचारिक साहित्याच्या पाठीमागे फार मोठा त्याग होता. ज्या उच्च विचारांच्या पाठीमागे महान त्याग असतो, ते विचार अधिक प्रभावीपणे दीर्घकालपर्यंत मोठी प्रेरणा देत राहतात.

धर्मानंद कोसंबी यांनी बहुतेक सर्वच लेखन मोकळया सरळ अस्सल मराठीत केले हे विशेष. जातककथा हे त्यांपैकीच एक. ई साहित्य प्रतिष्ठान महापंडीत धर्मानंद कोसंबी यांचे हे पुस्तक वाचकांसाठी सादर करीत आहे.

# जातक कथा

जातक कथा म्हणजे जन्माच्या कथा. जन्म कथा.

बौद्ध  धर्मानुसार गौतम बुद्धाने बुद्ध जन्म घेण्यापुर्वी अनेकदा जन्म घेतला आणि स्वतःचे शुद्धीकरण केले. यात कधी हत्ती, कधी वृक्ष, कधी हरीण, वाघ, तर कधी मानवी जन्मात, व्यापारी, राजा, नोकर, सैनिक असे अनेक जन्म घेतले. या कथा खूप मनोरंजक आहेत. पण त्यांचा हेतू केवळ टाईमपास नसून समाजाला सोप्या सरळ पद्धतीने नैतिकतेचे धडे देणे हा होता. या कथा अडिच हजार वर्षांपुर्वी लिहील्या गेल्या. त्यानंतरच्या काळातल्या हितोपदेश, पंचतंत्र किंवा ईसापनिती आदी जगभरातल्या सर्वच गोष्टींवर जातक कथांची छाप जाणवते.

जातककथांच्या द्वारे बौद्ध धर्म जगाच्या अर्ध्या भागावर पोहोचला. कलाकारांना त्यांनि स्फूर्ती दिली. अजिंठ्याच्या भिंतींवर असलेल्या चित्रे जातककथांचीच आहेत. वेरूळची सुमारे एक तृतियांश लेणीदेखील जातक कथांवर आधारित आहेत. जपान, इंडोनेशिया, अफ़गाणिस्तान, ब्रह्मदेश, नेपाळ, मलेशिया. थायलंड, चीन, व्हिएतनाम, लाओस, कांपुचिया अशा असंख्य देशांत हजारो लेणी, स्तुप आणि भित्तीचित्रांतून जातककथांची माहिती मिळते. आंध्र आणि महाराष्ट्र यांच्या सीमारेषेवर जन्मलेल्या या कथांनी संपूर्ण जग व्यापले आहे. जगातील सर्व भाषांमध्ये याची भाषांतरे झाली आहेत. किती गर्वाची गोष्ट आहे ना ही?

ई साहित्य प्रतिष्ठान मराठीमध्ये विनामूल्य ई पुस्तकांद्वारे जातककथा वितरित करत आहे. या कथा महान विद्वान धर्मानंद कोसांबी यांनी प्रचंड प्रयत्नांतून संकलित केलेल्या आहेत. या कथांतून आपण आपल्या मुलांवर संस्कार घडवावेत ही अपेक्षा आहे. कृपया या कथा जास्तीत जास्त वाचकांपर्यंत नेण्यासाठी आम्हाला मदत करा.

जातक कथा इंटरनेटवर विनामूल्य उपलब्ध करून देणाऱ्या यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानचे आम्ही ऋणी आहोत.

टीम ई साहित्य

# एकीचें व बेकीचें फळ

(सम्मोदमान जातक नं. ३३)



वाराणसींत ब्रह्मदत्त राजा राज्य करीत असतां बोधिसत्त्व लावा पक्ष्याच्या कुळांत जन्मून हजारों लाव्यांचा पुढारी होऊन अरण्यांत रहात असे. त्या काळीं एक पारधी त्यांच्या वस्तीच्या जागीं जाऊन एका ठिकाणीं चरणाऱ्या लाव्यांवर जाळें टाकी व त्यांत सापडलेल्या लाव्यांला बाजारांत विकून आपला निर्वाह करी. एके दिवशीं बोधिसत्त्व आपल्या समुदायांतील लाव्यांना म्हणाला, "हा पारधी आमच्या ज्ञातिवर्गाचा नाश करीत आहे. ह्याला एकच उपाय आहे तो हा कीं

जर तुम्हांपैकीं कोणी त्याच्या जाळयांत सांपडलें, तर एकमतानें ते जाळें घेऊन तुम्ही उडावें, व एकाद्या कांटेरी झुडपावर टाकून त्याच्या खालून निघून जावें."

दुसऱ्या दिवशीं कांही लाव्यांवर पारध्यानें जाळें टाकल्याबरोबर, बोधिसत्त्वाच्या उपदेशाप्रमाणें त्यांनीं तें उडवून नेलें, व एका कांटेरी झुडपावर टाकून त्याच्या खालून पळ काढिला. कांट्यांतून जाळें मोकळें करतां करतां पारध्याला सांज झाली, व रिकाम्या हातानेंच घरीं जाण्याचा प्रसंग आला. हा क्रम बरेंच दिवस चालला. तेव्हां त्याची बायको रागावून त्याला म्हणाली. "रोज रोज एक कवडीहि न आणतां घरी येतां; ह्याच्यावरून असें दिसतें कीं दुसरी कोणीतरी बाई तुम्ही संभाळली असली पाहिजे, व तिच्यासाठीं सर्व पैसा खर्चण्यांत येत असला पाहिजे."

पारधी म्हणाला, "भद्रे, ही तुझी समजूत चुकीची आहे. मला कोणतेंही व्यसन नाहीं पण मी काय करूं ? लावे एकजुटीनें जाळें घेऊन जातात व कांटेरी झुडपावर टाकतात; त्या योगें माझा सारा दिवस जाळें सोडविण्यांत जातो, आणि शेवटीं हातीं काहीं लागत नाहीं. तथापि मी निराश झालों नाहीं. जोपर्यंत त्यांच्यांत एकी आहे तोंपर्यंत जाळें घेऊन उडून जातील. पण जेव्हां आपसांत भांडूं लागतील, तेव्हां खात्रीनें माझ्या हातीं येतील."

कांही दिवसांनी चरावयाला जात असतांना एक लावा दुसऱ्याच्या डोक्यावरून गेला. त्यामुळें दुसऱ्याला राग आला. पहिल्या लाव्यानें क्षमा मागितली. तथापि दुसऱ्यानें तें न ऐकतां भांडण्यास सुरवात केली. होतां होतां सर्व समुदायांत फूट पडली. तेव्हां बोधिसत्त्वानें विचार केला कीं जेथे एकी नाहीं, तेथें सुरक्षितपणा नाहीं. आपण येथून दूर गेलेलें चांगलें. त्याप्रमाणें बोधिसत्त्व आपल्या वचनांत रहाणाऱ्या समुदायाला घेऊन दुसरीकडे निघून गेला. इकडे लाव्यांपैकीं कांही जण जेव्हां जाळयांत सांपडत तेव्हां तेथेंहि भांडणें करीत, पक्षप्रतिपक्ष करीत; व जाळें उडवून नेण्याचें सामर्थ्य न राहिल्यामुळें पारध्याच्या हातीं जात. अशा रीतीनें पारध्याची चांगली चैन चालली व बायकोची त्याच्यावर फार मर्जी बसली.



## कलहस्थानीं राहूं नये
(सकुण जातक नं. ३६)

एकदां बोधिसत्त्व पक्षाच्या कुळांत जन्मला व वयांत आल्यावर मोठ्या पक्षिसमुदायासह एका विस्तीर्ण वृक्षावर राहूं लागला. एके दिवशीं त्या वृक्षाच्या दोन शाखा परस्परांवर घांसल्या जाऊन त्यांतून धूर निघूं लागला. तेव्हां बोधिसत्त्व पक्षिसमुदायाला म्हणाला, "गडे हो, ज्या वृक्षाच्या आश्रयाला आम्हीं रहात आहों, त्याच्या शाखांतून हा धूर निघत आहे. म्हणजे येथे अनुकम्पेच्या ऐवजीं घर्षण होऊं लागलें आहे. ह्याचा परिणाम असा होणार आहे कीं, ह्या फांद्यांच्या घर्षणानें आग उत्पन्न होऊन सर्व वृक्ष नाश पावणार. म्हणून ह्या स्थानीं न रहातां आपण दुसऱ्या ठिकाणीं जाऊं."

बोधिसत्त्वाचा उपदेश ज्यांना रुचला, ते त्याच्याबरोबर आपल्या पोराबाळांसह दुसरीकडे निघून गेले. पण आपणास शहाणे समजणारे दुसरे होते, ते म्हणाले, "हा थेंबभर पाण्यांत मगर पहातो. अशा प्राण्याच्या उपदेशानें आम्हीं इकडे तिकडे फिरूं लागलों तर आम्हांस सुखशांति कधींच मिळावयाची नाहीं."

परंतु बोधिसत्त्वानें केलेलें भविष्य खरें झालें. एकाएकीं त्या फांद्यांतून आग निघाली, व त्या वृक्षानें पेट घेतला. तेथें राहिलेले पक्षी अकालीं दुसऱ्या ठिकाणीं जाऊं शकले नाहींत, व ते आगींत पडून जळून मेले.

## वृद्धसेवा.
(* तित्तिर जातक. नं. ३७)



प्राचीन काळीं हिमालय पर्वतावर एक तित्तिर पक्षी, एक वानर व एक हत्ती एका भव्य वडाच्या आश्रयानें रहात असत. परंतु त्यांच्यांत असावें तसें ऐक्य नव्हतें;

परस्परांविषयीं अनुकम्पा नव्हती. हा प्रकार तसाच चालणें इष्ट नसल्यामुळें त्यांनी असा विचार केला कीं, जो आपणांस वडील असेल त्याच्या सल्ल्यानें वागावें. तेव्हां वानर हत्तीला म्हणाला, "काय हो, तुम्ही ह्या वटवृक्षाला किती दिवसांपासून पहातां ? हत्ती म्हणाला, "जेव्हां हा वडाचा रोपा अगदी लहान होता, तेव्हां माझ्या बालपणीं मी त्याला पोटाखाली घालून वरून जात होतों. पण वानरदादा, तुम्हीं ह्या झाडाला केव्हांपासून ओळखतां ?"

वानर म्हणाला, "मी माझ्या लहानपणीं ह्या वडाच्या रोपाच्या अगदी अग्र-शाखेचीं पानें जमिनीवर उभा राहून तोडीत होतों. तेव्हांपासून ह्या झाडाला मी ओळखतों. पण तित्तिरदादा, तुम्हीं ह्याला किती दिवसांपासून पाहतां ?"

तित्तिर म्हणाला, "येथून बऱ्याचशा अंतरावर एक वडाचें झाड होतें. त्याचीं फळें खाऊन मी ह्या ठिकाणी शौचविधि करीत असे. त्यामुळें हें झाड येथें उगवलें; व तेव्हांपासून मी ह्या झाडाला ओळखत आहे."

ह्यावरून तित्तिरपक्षी त्या तिघांत वडील होता हें सिद्ध झालें, व तेव्हांपासून वानर व हत्ती तित्तिर पंडिताच्या सल्ल्यानें वागूं लागलें. तेणेंकरून त्या तिघांचेंहि त्या ठिकाणीं वास्तव्य फारच संतोषजनक झालें. तित्तिरपंडित आमचा बोधिसत्त्व होता हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

# शाठ्य सदांच साधत नसतें.

(बक जातक नं. ३८)



प्राचीनकाळीं बोधिसत्त्व एका सुंदर तलावाच्या काठीं असलेल्या वृक्षावर वृक्षदेवता होऊन रहात होता. त्या काळीं उन्हाळ्याच्या दिवसांत एका लहानशा तलावांतील पाणी आटत चाललें होतें; आणि त्यांत पुष्कळ मासे रहात असत. तेव्हां एक बगळा त्या तळयाच्या काठीं येऊन चिंताग्रस्त स्थितींत बसला. तें पाहून तळयांतील मासे त्याला म्हणाले, "हे आर्य, तूं कशाचा विचार करीत आहेस."

बगळा म्हणाला, "दुसरा कसला ? मी तुमच्या संबंधानेंच विचार करीत आहे. ह्या तळयांतील पाणी दिवसेंदिवस आटत चाललें आहे; खावयाला मिळण्याची मारामार, व उन्हाळा तर भयंकर ! तेव्हां हे बिचारे मासे आतां काय करतील ह्या विचारांत मी पडलों आहे," मासे म्हणाले, "मग ह्यांतून सुटण्याला आम्हांला कोणता उपाय ?" बगळा म्हणाला,

"जर माझा उपदेश ऐकाल तर तुम्हांपैकीं एकेकाला चोंचींत धरून एका मोठ्या सरोवरांत नेऊन सोडीन."

पण माशांना ही गोष्ट पटेना. ते म्हणाले,"असें कधी झालें आहे काय ? जगाच्या आरंभापासून माशांवर प्रेम करणारा बगळा कोणी पाहिला आहे काय ? आमच्यापैकीं एकेकाला दूर नेऊन मारून खाण्याचा तुझा हेतु असला पाहिजे."

बगळा म्हणाला, "माशांस बगळे मारून खातात हें खरें आहे. परंतु विश्वासघाताचें पातक मी कसें करीन. माझ्यावर तुम्हीं विश्वास ठेवून तरी पहा. आतां दुसरा एकादा उत्तम तलाव नाहीं असे तुम्हांस वाटत असेल, तर माझ्याबरोबर तुमच्यापैकीं एकाद्याला पाठवा म्हणजे त्याला मी तो तलाव दाखवून आणतों. तेव्हां तरी तुमची खात्री होईल."

माशांनीं खात्री करून घेण्यासाठीं आपणांपैकी एका मोठ्या काण्या माशाला त्याजबरोबर पाठविलें. त्यानें त्या माशाला मोठ्या सरोवरांत नेऊन सोडलें, व पुन्हां पूर्वस्थळी आणून पोहोचविलें. काण्या माशानें आपल्या भाऊबंधांसमोर नवीन तलावाचें रसभरीत वर्णन केलें. तेव्हां सर्व मासें तिकडे जाण्यास उत्सुक होऊन बगळयास म्हणाले, "आर्य, आम्हाला नेऊन त्या ठिकाणीं पोहोंचविण्याची मेहरबानी कर."

बगळयानें प्रथमतः त्या काण्या माशालाच तिकडे नेलें; व त्याला सरोवर दाखवून एका वृक्षाच्या फांद्यांच्या खांचींत दडपून मारून खाल्लें, व कांटे मुळांत टाकले; आणि पुन्हां माशांजवळ जाऊन, "आपण त्याला सोडून आलों; आतां ज्याची मर्जी असेल त्याला येऊं द्या," असें म्हणून आणखी एका माशाला आणून आणखी पूर्वीप्रमाणेंच त्याची गत केली. ह्याप्रमाणें सर्व माशांना त्यानें मारून खाल्लें. एक तेवढा खेंकडा ह्या तळयांत शिल्लक राहिला. तेव्हां बगळा त्याला म्हणाला, "बा खेंकड्या, तूं तरी तेथें कशाला राहातोस ? बाकी सर्व मासे सुखानें मोठ्या सरोवरांत संचार करीत आहेत. व तूं येथें एकटाच ह्या आटत जाणाऱ्या डबक्यांत बसला आहेस. तेव्हां चल माझ्या बरोबर. मी तुला त्या सुंदर तलावांत नेऊन पोहोचवितों."

खेंकड्यानें विचार केलां कीं, "ह्या चोरानें माशांना नेऊन मारून खाल्लें कीं जिवंत सोडलें हें कोणी सांगावें ? पण ह्याच्या बरोबर जाऊन त्यांची स्थिती काय झाली, हें पाहण्यास हरकत नाहीं, जर ह्यानें सुखरूपपणें मला पोहोंचविलें तर ठीकच आहे; न पेक्षां माझ्या तावडींतून हा जिवंतपणें

निघून जाणार नाहीं ह्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे." तो बगळयास म्हणाला, "बगळेमामा, माशांना तुम्हीं नेलेंत हें ठीक झालें. परंतु मला कसें न्याल ? बगळा म्हणाला, "कसें म्हणजे ? चोंचींत धरून !" खेंकडा म्हणाला, "एकतर तुमच्या चोंचीत मी मावणार नाहीं; व दुसरें असें कीं मी गुळगुळीत असून घट्ट आहें, तेव्हां तुम्हांला मला नीट पकडतां यावयाचें नाहीं. पण माझे हे आंकडे फार सुदृढ आहेत. ह्यांनी जर मी आपल्या मानेला धरून लोंबकळत राहिलों, तर खालीं पडण्याची भीती नाहीं आणि त्या योगें तुम्हीं मला सुरक्षितपणें तिकडे घेऊन जाल."

बगळयाला ही गोष्ट पसंत पडली. खेंकड्याला आपल्या मानेला लटकावून तो सरोवराजवळ गेला, व त्याला तें सरोवर दाखवून वहिवाटीप्रमाणें आपल्या नेहमींच्या वृक्षाकडे वळला. तेव्हां खेंकडा म्हणाला, "बगळे मामा, सरोवर तर ह्या बाजूला राहिलें, आणि तुम्ही मला येथें कोठें नेता ?"

बगळा रागावून म्हणाला, "काय, मोठे आले आहेत कीं नाहीं तुम्हीं आमचे भाचे ! तुला गळयाला लटकावून फिरत आहें, म्हणून तूं मला दास समजतोस काय ? हा पहा इकडे त्या माशांच्या कांट्यांचा केवढा ढीग पडला आहे ! तुझींहि हाडें ह्याच राशीवर पडणार हें पक्कें लक्षात ठेव."

खेंकडा म्हणाला, "त्या माशांच्या मूर्खपणामुळें, त्यांना मारून खाणें तुला सोपें गेले. पण आतां प्रसंग खेंकड्याशीं आहे हें तूं विसरूं नकोस. माझ्या आंकड्यांनीं तुझी जी मान पकडली आहे ती उगाच नव्हे. एवीं तेवीं मला जर मरावयाचें आहे तर आपण दोघेहि बरोबरच मरूं. हें पहा, तुझें डोकें कापून कसें खालीं पाडतों ते !" असें म्हणून त्यानें आपल्या आंकड्यांनीं बगळयाची मानगुटी दाबली. बगळयाची बोबडी वळली, व डोळे पांढरे होण्याची पाळी आली. तो म्हणाला, "महाराज, माझ्यावर मेहेरबानी करा. मला जीवदान द्या. मी तुम्हांला सुरक्षित तलावांत पोहोंचवून देतों.

खेंकड्यानें "ठीक आहे" असें उत्तर दिल्यावर बगळयानें त्याला नेऊन सरोवराच्या पाण्याच्या कांठीं हळूच चिखलावर ठेवलें. तेव्हां खेंकड्यानें कमळाच्या देंठाप्रमाणें त्याचा गळा कापून टाकला, व पाण्यांत प्रवेश केला. तेव्हां वृक्षदेवतेच्या रूपानें रहाणारा आमचा बोधिसत्त्व म्हणाला, "शठ आपल्या शाठ्यानें सदोदित सुखी होतो असें नाहीं. बकाला जसा खेंकडा भेटला तसा शठाला कोणीतरी भेटतोच."

# हलकटाचें बल द्रव्य

(नंद जातक नं. ३९)



वाराणसी नगरींत ब्रह्मदत्तराजा राज्य करीत असतां बोधिसत्त्व एका गृहस्थाच्या कुळांत जन्मला होता. त्याच्या एका मित्रानें उतारवयांत लग्न केलें होतें; व त्या संबंधापासून त्याला एक मुलगा झाला. तेव्हां त्यानें असा विचार केला कीं, माझी बायको अद्यापि तरुण आहे, व मी जर मरण पावलों तर ती दुसरें लग्न करून घरांत असलेले द्रव्य त्या नवऱ्याच्या स्वाधीन करण्यास मागें पुढें पहावयाची नाहीं, व त्यायोगें माझ्या मुलाची मोठी हानि होईल. म्हणून त्यानें नंद नांवाच्या आपल्या दासाकडून घरांतील सर्व द्रव्य जंगलांत नेववून एका ठिकाणीं पुरून ठेविलें. व तो नंदाला म्हणाला, "माझा मुलगा वयांत आल्यावर त्याला हें द्रव्य दाखवून दे; व त्याला सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाऊं नकोस."

त्यानंतर कांही काळानें तो गृहस्थ मरण पावला. त्याचा मुलगा वयांत आल्यावर आई त्याला म्हणाली, "बाळ, तुझ्या पित्यानें नंद दासाकडून घरांतील द्रव्य कोठेंतरी गाडून ठेविलें आहे. तें नंदाला विचारून उकरून काढ, व त्याचा व्यापारधंद्यांत उपयोग कर."

तेव्हां तो मुलगा नंदाला म्हणाला, "नंद मामा, माझ्या वडिलांनी पुरून ठेविलेलें कांही द्रव्य आहे काय ?" नंदानें "होय" असें उत्तर दिलें. नंतर एके दिवशीं तें द्रव्य घेऊन येण्याच्या उद्देशानें कुदळ, टोपली वगैरे घेऊन ते दोघे जंगलात गेले. तेथें ज्या जागीं धन पुरून ठेविलें होतें त्या जागी उभा राहिल्याबरोबर नंद मोठ्या गर्वानें त्या मुलाला म्हणाला, "अरे दासीपुत्रा, ह्या ठिकाणीं धन तुला कोठून मिळणार ?"

ह्याप्रमाणें जेव्हां जेव्हां द्रव्य आणण्याच्या हेतूनें ते दोघे अरण्यांत जात व नंद त्या ठिकाणीं उभा राही, तेव्हां तेव्हां तो ह्या तरुण मुलाला अनेक शिव्यागाळी देत असे. तरी नंदाच्या हातीं आपली किल्ली आहे हें जाणून तो मुलगा मोठ्या विचारानें त्याच्या त्या शिव्यागाळी सहन करीत असे. शेवटीं कंटाळून जाऊन तो आपल्या बापाच्या मित्रापाशीं-बोधिसत्त्वापाशीं-गेला; व त्यानें त्याला इत्थंभूत वर्तमान सांगितलें. तेव्हां बोधिसत्त्व त्याला म्हणाला, "द्रव्य पुरून ठेवलेली जागा सांपडणें कठीण नाहीं. ज्या ठिकाणीं उभा राहून नंद तुला शिव्यागाळी देतो, त्या ठिकाणींच तें धन पुरलेलें असावें. का कीं, द्रव्याच्या सान्निध्यानें हलकटाला बळ चढतें. पुनरपि जेव्हां त्या ठिकाणीं राहून नंद तुला शिव्या देईल तेव्हां त्याला तेथून ओढून काढ, व तेथें खण म्हणजे तुला तें द्रव्य सांपडेल."

बोधिसत्त्वाच्या सल्ल्याप्रमाणें वागून, त्या तरुणानें तें द्रव्य आपल्या घरी आणलें व त्याचा सदुपयोग केला.

# सत्कर्में करण्यास भिऊं नये.

(खदिरंगारजातक नं.४०)



दुसरा एक ब्रह्मदत्त राजा वाराणशी नगरींत राज्य करीत असतां बोधिसत्त्व तेथल्या महाश्रेष्ठीच्या कुलांत जन्मला. तो मोठ्या परिवारासह वृध्दिंगत होऊन सोळा वर्षे होण्यापूर्वीच सर्व कलाकौशल्यांत निपुण झाला. पुढें कांहीं कालानें पित्याच्या मरणानंतर त्याला वाराणशी नगरींतील श्रेष्ठीस्थान (मुख्य व्यापाऱ्याची जागा) मिळालें, व त्यानें आपल्या औदार्यानुरूप शहराच्या चारी बाजूस चार, मध्याला एक व आपल्या वाड्याशेजारीं एक अशा गोरगरीबांसाठीं सहा दानशाळा स्थापन केल्या. त्याशिवाय तो शीलाचें रक्षण करीत असे, व उपोसथाच्या दिवशीं उपोसथव्रत पाळीत असे.

एके दिवशीं माध्यान्ह भोजनापूर्वी बोधिसत्त्वाच्या द्वारासमोर एक बुद्ध भिक्षेसाठीं येऊन उभा राहिला. त्याला पाहून बोधिसत्त्व आपल्या आसनावरून उठला व त्याची पूजा करून आपल्या नोकराला त्यानें हांक मारली. नोकरानें 'महाराज काय आज्ञा आहे' असें म्हटल्यावर, बोधिसत्त्व म्हणाला, "आपल्या दारांत उभा असलेल्या आर्यांचे पात्र घेऊन ये."

त्याच क्षणीं मारानें तेथें येऊन ऐशीं हात लांबीचा जळणाऱ्या कोळशांचा भयंकर खड्डा उत्पन्न केला. प्रत्येक-बुद्धाला भिक्षा मिळूं नये, व श्रेष्ठीच्या पुण्यकर्माला बाध यावी, अशी माराची इच्छा होती; म्हणून त्यानें हा खळगा आपल्या सामर्थ्यानें उत्पन्न केला. भिक्षापात्र आणण्यासाठीं गेलेला मनुष्य खदिरांगार परिंपूरीत अवीचि नरकासारख्या जळजळणाऱ्या त्या खड्ड्याकडे पाहून अत्यंत भयचकित होऊन मागें फिरला. बोधिसत्त्वानें त्याला मागें फिरण्याचें कारण विचारलें तेव्हां तो म्हणाला "धनीसाहेब, आपल्या दरवाजांत भयंकर आगीचा खड्डा उत्पन्न झाला आहे तेथून म्यां कसें जावें ?" बोधिसत्त्वानें दुसऱ्या कित्येक नोकरांना प्रत्येक-बुद्धाचें भिक्षापात्र आणण्यास पाठविलें परंतु तो आगीचा खड्डा ओलांडून जाण्याचें एकालाहि धाडस झालें नाहीं. ते सर्व भयभीत होऊन पळाले.

तेव्हां बोधिसत्त्व स्वतः प्रत्येक-बुद्धाचें पात्र आणण्यासाठीं गेला व त्या जळणाऱ्या खड्डयाच्या कांठावर राहून त्यानें इतस्ततः पाहिलें. अंतराळीं मार उभा होता त्याकडे वळून बोधिसत्त्व म्हणाला, "तूं कोण आहेस ?" "मी मार आहें" मारानें उत्तर दिलें. "हा खड्डा तूं उत्पन्न केला आहेस काय ?" श्रेष्ठीनें विचारिलें. मारानें "होय." असें उत्तर दिल्यावर बोधिसत्त्वानें प्रश्न केला "हा खड्डा तूं कशासाठीं उत्पन्न केलास ?" मार म्हणाला, "तुझ्या दानाला अंतराय व्हावा व प्रत्येक बुद्धाला भिक्षा मिळूं नये असा माझा उद्देश आहे." बोधिसत्त्व म्हणाला "या खड्डयांतच नव्हे तर भयंकर नरकांत देखील खालीं डोकें आणि वर पाय करून पडण्याला मी तयार आहे, परंतु सत्कृत्यापासून परावृत्त होण्यास मी तयार नाहीं." असें बोलून प्रत्येक बुद्धाकडे वळून बोधिसत्त्व म्हणाला "भदंत, भिक्षेचें ग्रहण केल्यावाचून येथून जाऊं नका." असें बोलून बोधिसत्त्वानें आपल्या हातांत अन्नानें भरलेलें ताट घेतलें, व त्या प्रदीप्त खड्डयामध्यें उडी टाकली. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्या अग्नीपासून बोधिसत्त्वाला कांहीच बाधा झाली नाहीं. जूण काय बोधिसत्त्व कमल पुष्पाच्या राशींतूनच चालत गेला, व त्यानें प्रत्येक-बुद्धाचें पात्र अन्नानें भरलें.

साधूंना सत्कर्मांच्या आड येणारीं विघ्नें आनंदच देत असतात ! आगीच्या खाईं फुलाच्या राशींप्रमाणें वाटतात !!

# भलत्याच मार्गानें उपजीविका करूं नये.

## (कपोतजातक नं. ४२)



एकदां आमचा बोधिसत्त्व पारव्याच्या कुळांत जन्मला होता. त्याकाळीं वाराणशीनगरवासी लोक पुण्यबुद्धीनें पुष्कळ ठिकाणीं तुसानें भरलेल्या पिशव्या टांगून ठेवीत असत. हेतू एकढाच कीं त्या पिशव्यांत पक्ष्यांनीं आपलीं घरटीं करावीं. वाराणशीच्या महाश्रेष्ठीच्या स्वयंपाक्यानें देखील असली एक पिशवी आपल्या पाकशाळेंत टांगली होती. त्या पिशवींत आमचा बोधिसत्त्व रहात असें.

एके दिवशीं स्वयंपाक्यानें मत्स्यमांसादिक पदार्थ धुवून टाकलेल्या पाण्याच्या गंधानें लुब्ध झालेला एक कावळा आपला प्रवेश त्या पाकशाळेंत कसा होईल या विचारांत पडला, व तेथेंच

जवळ बसून राहिला. बोधिसत्त्व नियमाप्रमाणें चरण्यासाठीं जंगलांत जात असतां त्याला त्या कावळयानें पाहिलें. व तो मनांत म्हणाला, "या पारव्याची संगती केली असतां श्रेष्ठीच्या महानसांतील मत्स्यमांसादिक पदार्थांचा आस्वाद घेण्यास संधि सांपडेल." दुसऱ्या दिवशीं बोधिसत्त्व बाहेर निघण्यापूर्वीच कावळा तेथे येऊन बसला, व बोधिसत्त्वाच्या मागोमाग जंगलांत शिरला. या कावळयाच्या कृत्याचा अर्थ न समजल्यामुळें त्याला बोधिसत्त्व फ़सला.

कावळा म्हणाला, "महाराज, तुमचें आचरण इतकें चांगलें आहे कीं, आजपासून तुमच्याच सेवेंत आयुष्य घालाविण्याचा मी निश्चय केला आहे."

बोधिसत्त्व म्हणाला, "पण आमचे दोघांचे जुळावें कसें. माझें भक्ष्य निराळें तुझें भक्ष्य निराळें.

कावळा म्हणाला, "महाराज, तुम्ही ज्यावेळीं आपला चारा शोधण्यासाठीं जाल त्यावेळीं मी देखील तुमच्या बरोबर जाऊन माझ्या पोटाची व्यवस्था करीन."

बोधिसत्त्व म्हणाला, "असें असेल तर ठीक आहे. पण माझ्यासारखें तूं देखील मोठ्या सावधगिरीनें वागलें पाहिजे."

याप्रमाणें कावळयाला उपदेश करून बोधिसत्त्व गवताच्या बीजावर आपली तृप्ति करूं लागला. कावळयानें देखील गाईच्या शेणांतील किड्यांवर आपला निर्वाह केला. संध्याकाळीं बोधिसत्त्वाबरोबरीच तो त्या पाकशाळेंत आला. तेव्हां स्वयंपाक्यानें तो पारव्याचा मित्र असावा अशी कल्पना करून त्याच्यासाठीं दुसरी एक तुसाची पिशवी टांगून दिली. त्या दिवसापासून दोघेजण तेथें राहूं लागले.

एके दिवशीं श्रेष्ठीच्या घरीं पुष्कळ मासे आणि मांस आणलें होतें. स्वयंपाक्यानें तें पाकशाळेंत जिकडे तिकडे लोंबकळत ठेविलें. संध्याकाळी कावळयाची दृष्टी जेव्हां त्यावर पडली तेव्हां त्याच्या पोटांत दुखूं लागलें, व त्यावर कसा ताव मारितां येईल या विवंचनेंत त्यानें सारी रात्र घालविली. दुसऱ्या दिवशीं चरावयाला निघण्याच्या वेळेला बोधिसत्त्व त्याला म्हणाला, "कावळेबुवा चला आतां; चरावयाला निघण्याची वेळ झाली." कावळा म्हणाला "महाराज, माझ्या पोटांत, दुखत

आहे. तेव्हां तुम्हीच जा." बोधिसत्त्व म्हणाला, "पण मित्रा, कावळयाला पोटदुखीचा रोग झाला असे कोणीच ऐकिलें नाहीं; आणि कितीही खाल्लें तरी त्याची तृप्ति होते असेंहि नाहीं. पण मला वाटतें आज तुझी दृष्टी या माशांवर व मांसावर गेल्यामुळे तुझ्या या पोटदुखीला आरंभ झाला असावा. हें मनुष्याचें भक्ष्य आहे, व आमच्यासारख्या आश्रिताचें भक्ष्य नाहीं हें लक्षांत ठेव, आणि अशा पदार्थावर कुदृष्टि न ठेवितां रोजच्याप्रमाणें माझ्याबरोबर चरावयाला चल. कावळा म्हणाला "तुम्ही म्हणतां हें मला कबूल आहे परंतु तुमच्याबरोबर जाणें आज अगदींच अशक्य आहे. पारवा म्हणाला, "असें आहे तर तूं येथेंच रहा. पण निदान लोभाला वश होऊन घातक कर्म करूं नकोस !"

बोधिसत्त्व चरण्यासाठीं बाहेर गेल्यावर कावळा स्वयंपाक घरांत काय प्रकार चालला हें हळूच मान वर काढून पहात बसला. स्वयंपाक्यानें सर्व पाकाची सिद्धता करून ठेविली, व तो विश्रांतीसाठी थोडा वेळ स्वयंपाकघराबाहेर पडला. ही संधी साधून कावळा आपल्या निवासस्थानांतून बाहेर पडला, आणि विचार करूं लागला कीं, मांसाचे लहान तुकडे खावे किंवा एकदम एखादा मोठा तुकडा लांबवावा. शेवटीं, एखादा मोठा तुकडा घेऊन पिशवींत जाऊन बसण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु स्वयंपाक्यानें मांसाचे तुकडे झांकून ठेविले होते त्यावरील झांकण जेव्हां कावळयानें खाली पाडलें तेव्हां स्वयंपाक्याला संशय येऊन तो आंत शिरला. त्यानें कावळयाचें दुष्ट कृत्य पाहिलें, व तो आपणाशींच म्हणाला, "माझ्या धन्यासाठीं तयार केलेलें पक्वान्न हा दुष्ट कावळा खाऊं पहात आहे ! जणूं काय हाच माझा धनी आहे ! तेव्हां आतां या खळाला भरपूर प्रायश्चित्त दिल्यावांचून रहातां कामा नये !" त्यानें दारें आणि खिडक्या बंद करून कावळयाला पकडलें व त्याची पिसें उपटून आल्याच्या रसांत मीठ आणि जिऱ्याची पूड मिसळून त्याच्या अंगाला लेप दिला; आणि त्याला त्या पिशवींत टांकिलें. कावळा अत्यंत पीडित होऊन तेथें तळमळत पडला !

बोधिसत्त्व बाहेरून संध्याकाळी परत आल्यावर त्याची ती अत्यंत हृदयद्रावक दुर्दशा पाहून म्हणाला, "अरे लोभी कावळया, तूं माझें वचन न ऐकल्यामुळें या संकटांत पडलास ? जो आपल्या हितमित्राचें वचन ऐकत नाहीं, व लोभाला वश होऊन खोट्या मार्गानें आपली उपजीविका करूं पाहतो, त्याची गत अशीच होत असते.

## दुष्टाला आश्रय देऊं नये.

## (वेळुक जातक नं. ४३)



एकदां बोधिसत्त्व काशीराष्ट्रामध्यें एका मोठ्या धनाढ्य कुळांत जन्मला होता. वयांत आल्यावर प्रापंचित सुखें तुच्छ वाटून आणि वैराग्यसुख श्रेष्ठ वाटून त्यानें तापसवेश स्वीकारला व हिमालयाचा मार्ग धरिला. तेथें त्याची फार ख्याती होऊन त्याच्याजवळ पुष्कळ तपस्वी शिष्यभावानें राहूं लागले.

त्या प्रदेशांत एका तपस्व्याच्या आश्रमांत एके दिवशीं एक काळ-सर्पाचें पिल्लूं रांगत रांगत आलें. त्या तपस्व्याला त्याचें मोठें कौतुक वाटून त्यानें त्या बालसर्पासाठीं एक वेळवाचें नळकांडें तयार केलें, व त्यांत गवत वगैरे घालून त्या पोराची रहाण्याची सोय करून दिली. वेळूच्या नळकांड्यांत रहात असल्यामुळें त्या सापाला वेळुक असें नांव पडलें व त्या तपस्व्याला सर्व तपस्वी थट्टेनें वेळुकपिता असें म्हणूं लागले.

बोधिसत्त्वाला हें वर्तमान समजल्यावर तो त्या तपस्व्याजवळ गेला, आणि त्यानें त्याच्या या कृत्याचा निषेध केला. तो म्हणाला, "कालसर्पाबरोबर तूं सहवास करितोस हें खरें आहो काय ?" तपस्वी म्हणाला, "होय महाराज, ही गोष्ट खरी आहे. माझें त्याच्यावर फार प्रेम आहे." बोधिसत्त्व म्हणाला, "भलत्यावर प्रेम करून त्याला आश्रय देणें हें मोठें धोक्याचें आहे. या सापाकडून तुझ्या जीविताला अंतराय घडला तर त्यांत मला मुळींच आश्चर्य वाटणार नाहीं." त्या तपस्व्याला बोधिसत्त्वाचा उपदेश रुचला नाहीं. त्यानें त्या सर्पाचा त्याग न करितां खाऊं पिऊं घालून तसाच वाढविण्याचा क्रम चालविला.

एके दिवशीं त्या भागांतील सर्व तपस्वी फळमूलाचा शोध लावण्यासाठीं दूरच्या प्रदेशांत गेले होते. तेथें चांगली फळें सांपडल्यामुळें त्यांनीं दोन तीन दिवस मुक्काम केला. पुनः परत आल्यावर वेळुकपित्याला आपल्या वेळुकाची आठवण होऊन तो त्या वेळूच्या नळकांड्याकडे धांवत गेला आणि हात पुढें करून मोठ्या सद्‍गदित स्वरानें म्हणाला, "बाळा, वेळुका, आज दोन दिवस तुझी मीं हेळसांड केली. माझ्या वियोगानें तुला किती तरी दुःख झालें असेल. चल, बाहेर ये. मी तुला खाऊं घालतों." तो भुकेलेला सांप अत्यंत चवताळून वेळूच्या नळकांड्यांतून बाहेर पडला आणि कडाडून तपस्व्याच्या हाताला चावला ! बिचारा तपस्वी शेवटले शब्दहि उच्चारूं शकला नाहीं ! तो तेथेंच जमिनीवर पडून प्राणाला मुकला ! तें पाहून खळाला आश्रय दिल्याचें हें फळ आहे असें सर्व तपस्वी म्हणूं लागले.

## शहाणा शत्रू बरा, पण मूर्ख मित्र नको !
## (भकस जातक नं. ४४)



प्राचीनकाळीं काशीराष्ट्रांत एका खेडेगांवीं पुष्कळ सुतार रहात असत. त्यांतील एकजण आपल्या कामांत गढून गेला असतां त्याच्या डोक्यावर एक माशी येऊन बसली, व ती त्याला फार त्रास देऊं लागली. त्याचे दोन्ही हात गुंतल्यामुळें तो जवळ असलेल्या आपल्या तरूण मुलाला म्हणाला "मुला ही माशी मला मघांपासून फार त्रास देत आहे. तिला जरा घालवून दे पाहूं." मुलगा म्हणाला, "बाबा, जरा थांबा; मी त्या माशीचा एकदम निकालच लावून टाकतों." असें म्हणून त्यानें जवळ असलेली तीक्ष्ण धारेची कुऱ्हाड उचलली व बापाच्या मागल्या बाजूला जाऊन माशीला मारण्यासाठी त्याच्या डोक्यावर मारिली. माशी उडून गेलीच; पण सुताराच्या डोक्याचीं मात्र दोन शकलें झालीं ! तो तत्काळ प्राणास मुकला.



आमचा बोधिसत्त्व त्या काळीं व्यापारी कुलांत जन्मला होता, व आपल्या उद्योगधंद्यासाठीं तो या ठिकाणीं आला होता. या मूर्ख पोराचें हें कृत्य पाहून तो तेथें जमलेल्या सुताराला म्हणाला, "बाबानों शहाणा शत्रू पुरवला, परंतु मूर्ख मित्र नको आहे ! या मूर्ख पोरानें आपल्या पित्याची कामगिरी बजावीत असतां त्याचाच नाश करून टाकाला !"

## मूर्खावर आपलें काम सोपवूं नये.

## (आरामदूसक जातक नं. ४३)



एका काळीं वाराणसी नगरींत उत्सवाची उद्घोषणा करण्यांत आली होती. त्या दिवसापासून सर्व लोकांनी उत्सवास सुरवात केली. पण राजाच्या बगीच्यांतील माळयास आपलें काम टाकून या उत्सवास जातां येईना. पुढें त्याला अशी एक युक्ति सुचली कीं, आपल्या उद्यानांत रहाणाऱ्या वानरांच्या टोळीवर बगीच्याला पाणी देण्याचें काम सोपवून आपण एक दिवस तरी उत्सवाला जावें. तो त्या टोळींतील मुख्य वानराला म्हणाला, "मित्रा या उद्यानापासून मला जसा फायदा आहे तसा तो तुम्हाला देखील आहे. येथील फलपर्णादिक खाऊन तुम्ही आपला निर्वाह करितां. तेव्हां एक दिवस माझे थोडें काम करणें तुमचें कर्तव्य आहे.

तो वानर म्हणाला "आपलें काय काम आहे ते आम्हांस समजावून द्या म्हणजे आम्हाला शक्य असेल तें आम्ही करूं."

माळी म्हणाला "तुम्ही या झाडाच्या रोप्यांना आजचा दिवस तेवढें पाणी द्या म्हणजे तेवढ्या अवधींत मी उत्सवाची थोडी मौज पाहून माघारी येतों. तो वानर म्हणाला "ठीक आहे, आम्ही मोठ्या संतोषानें हें काम करितों.

माळी पखाली आणि लांकडाची भांडी वानरांच्या स्वाधीन करून शहरांत गेला. इकडे मुख्य वानर आपल्या टोळींतील वानरांत म्हणाला, "आमच्यावर सोपविलेलें काम आम्हीं मोठ्या शिताफीनें केलें पाहिजे. येथल्या पाण्याचा अपव्यय न करितां तें मोठ्या शिताफीनें केलें पाहिजे. येथल्या पाण्याचा अपव्यय न करितां तें मोठ्या काटकसरीनें वापरलें पाहिजे, नाहींतर आम्हास आणि बागवानाला पाण्यासाठीं त्रास सोसावा लागेल. तेव्हां तुम्ही झाडाच्या रोपांला पाणी देत असतांना त्यांच्या मुळाच्या प्रमाणानें पाणी देत जा. ज्यांचीं मुळें खोल गेलीं असतील त्यांना जास्ती पाणी द्या व ज्यांचीं उथळ असतील त्यांना कमी द्या."

वानरांनीं आपल्या पुढाऱ्याच्या आज्ञेप्रमाणें सर्व रोपें उपटून पाहून त्यांच्या मुळांच्या प्रमाणावर त्यांस पाणी दिलें !

या वानरांच्या कृत्यामुळें बिचाऱ्या बागवानाचें किती नुकसान झालें असेल याची कल्पनाच केली पाहिजे ! मूर्खावर जो आपल्या कामाचा भार टाकतो त्याची शेवटीं अशीच हानि होते !!



# आपल्या सामर्थ्याचा अकालीं उपयोग करूं नये.

# (वेदब्भ जातक नं. ४८)



प्राचीनकाळीं काशीराष्ट्रांतील एका गांवीं एक ब्राह्मण रहात असे. त्याला वैदर्भ नांवाचा एक मंत्र अवगत होता. त्या मंत्राचें सामर्थ्य असें होतें कीं नक्षत्रयोग जाणून त्याचा जप केला असतां आकाशांतून सुवर्णरजतादिक पदार्थांची वृष्टि होत असे. आमचा बोधिसत्त्व या ब्राह्मणाचा शिष्य होता. एके दिवशीं ते दोघे कांहीं कारणानिमित्त चैत्यदेशाला जाण्यासाठीं निघालें. वाटेंत एका जंगलांत त्याला पांचशें चोरांनीं गांठलें.

या चोरांना ओलीस धरणारे चोर असें म्हणत असत. कां कीं जेव्हां त्यांच्या हातीं पिता आणि पुत्र सांपडत तेव्हां ते पुत्राला ठेवून घेऊन पित्याला द्रव्य आणण्यासाठीं घरीं पाठवीत असत, जेष्ठ आणि कनिष्ठ भाऊ हातीं लागले असतां जेष्ठाला घरीं पाठवीत व कनिष्ठाला ओलीस धरून त्यांजकडून द्रव्य मिळवीत असत म्हणून त्यांना ओलीस धरणारे चोर असे म्हणत असत.

या चोरांनीं बोधिसत्त्वाला आणि वैदर्भमंत्रवेत्त्या ब्राह्मणाला जेव्हां पकडलें, तेव्हां गुरूला ओलीस धरून शिष्याला (बोधिसत्त्वाला) द्रव्य आणण्यासाठीं घरीं पाठविलें. जातांना बोधिसत्त्व आपल्या गुरूस एकीकडे नेऊन हळूच म्हणाला, "आज पुष्कळ वर्षांनी आकाशांतून सुवर्णरजतादिकांची वृष्टि आपल्या मंत्रभावानें होईल असा नक्षत्र-योग आला आहे. परंतु आपण या प्रसंगीं आपल्या मंत्राचा बिलकूल उपयोग करूं नये. जर आपण अशा भलत्याच वेळीं मंत्रजप कराल तर आपली आणि या सर्व चोरांची अत्यंत हानि होईल. तेव्हां यांनीं जरी आपणाला थोडाबहुत त्रास दिला तरी तो सहन करा. मी एक दोन दिवसांत पैसे घेऊन परत येईपर्यंत दम धरा.

आपल्या गुरूला याप्रमाणें सांगून बोधिसत्त्व तेथून निघून गेला. सूर्यास्तानंतर चोरांनी ब्राह्मणाचे हातपाय बांधून त्याला खाली निजविलें. इतक्यांत पूर्ण दिशेला अलंकृत करणाऱ्या पूर्णचंद्राचा उदय झाला. ब्राह्मणानें आकाशाकडे पाहिलें, आणि नक्षत्रयोग बरोबर जुळून येत आहे असें जाणून तो आपणाशींच म्हणाला, "या विपत्तींत पडण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. येऊन जाऊन चोरांला पाहिजे आहे तें धन. आपण जर यांना आतांच्या आतां दिलें तर ते मला मोकळें करतील, व मी त्रासांतून मुक्त होईंन." तो चोरांना म्हणाला "चोर हो, माझे हे हाल तुम्ही कां करितां ?"

चोर म्हणाले, "द्रव्यप्राप्तीवांचून, दुसरा आमचा कोणताही हेतु नाहीं."

ब्राह्मण म्हणाला, "एवढेंच जर असेल तरी मला या बंधनांतून मोकळें करा, व न्हाऊं घालून नूतन वस्त्र परिधान करवून गंध पुष्पांनीं माझें शरीर सजवून मला आसनावर बसवा."

चोरांनीं त्याच्या सांगण्याप्रमाणें केल्यावर ब्राह्मणानें मंत्रजप करून आकाशाकडे पाहिलें. तत्क्षणीं आकाशांतून सुवर्णरजतादिकांचा पाऊस पडला ! चोरांनीं तें द्रव्य गोळा करून आपल्या उपरण्यांनीं गांठोडी बांधिलीं व तेथून प्रयाण केलें. ब्राह्मणाला त्यांनी तेथेंच सोडून दिलें.

त्या चोरांला वाटेंत दुसऱ्या पांचशें चोरांनी गांठलें, व त्यांची मोठमोठाली गांठोडीं पाहून ते त्यांना म्हणालें, "हें द्रव्य तुम्ही कसें मिळविलें ? याचा जर आम्हास वांटा द्याल तरच तुम्हास आम्हीं सोडून देऊं; नाहीं तर सर्वांना येथें ठार करूं."

द्रव्याचीं गांठोडीं वहाणारे चोर म्हणाले, "बाबांनो, आमच्याशीं लढाई करून आमच्या नाशाला कां प्रवृत्त होतां ? हा आमच्या मागोमाग येणारा ब्राह्मण केवळ आकाशाकडे पाहून द्रव्याचा पाऊस पाडूं शकतो ! त्यानेंच मंत्रसामर्थ्यानें हें धन आम्हास दिलें आहे."

तेव्हां त्या रिकाम्या चोरांनीं धनवान चोरांना सोडून देऊन त्यांच्या मागोमाग जाणाऱ्या ब्राह्मणास गांठलें, व ते त्याला म्हणाले "हे ब्राह्मणश्रेष्ठा, मंत्रसामर्थ्याच्या योगानें तूं धनाची वृष्टि करूं शकतोस असें आमच्या व्यवसाय बंधूंनीं आम्हाला सांगितलें आहे. तेव्हां आतां मंत्राचा तप करून द्रव्याचा पाऊस पडेल असें कर."

ब्राह्मण म्हणाला, "चोरहो, मी तुम्हाला मोठ्या खुषीनें द्रव्य दिलें असतें; परंतु या वर्षी नक्षत्राचा योग जुळून येण्याचा संभव दिसत नाहीं. पुढल्या वर्षी जर तुम्हीं मला भेटाल, तर नक्षत्राचा योग पाहून मीं तुमच्यावर सुवर्णादिकांचा पाऊस पाडीन."

हे ब्राह्मणाचे शब्द ऐकून चोर अत्यंत संतापले, व त्यांनीं तेथेंच त्या ब्राह्मणाचा वध केला. पुढें गेलेल्या चोरांजवळ अवजड गांठोडी असल्यामुळें ते त्वरेनें जाऊं शकले नाहींत. त्या रिकाम्या चोरांनीं त्यांजवर एकाएकीं घाला घालून सर्वांना ठार मारलें, व सर्व धन हिरावून घेतलें. पुनः या पांचशें चोरांत दोन तट पडून कलहास सुरुवात झाली, व परस्परांत यादवी माजून दोन सोडून बाकी सर्व चोरांचा नाश झाला ! शिल्लक राहिलेल्या दोन चोरांनीं असा विचार केला कीं, हे धन घरीं घेऊन जाणें शक्य नाहीं. तेव्हां तें या अरण्यांतच कोठेंतरी लपवून ठेवावें. त्यांनीं ती सर्व गांठोडीं एका गुहेंत गोळा केलीं व एक नागवी तरवार घेऊन तेथें पहारा करण्यास उभा राहिला. दुसरा जेवण घेऊन येण्यासाठीं गांवांत गेला.

लोभ विनाशाचें मूळ होय. पहारा करणाऱ्या चोरांच्या मनांत असा विचार आला कीं, "हा दुसरा चोर परत आल्यावर मला या धनाचा अर्धा वांटा त्याला द्यावा लागेल त्यापेक्षां तो येथें येतांच जर मीं त्याला ठार केलें तर हें सर्व धन माझ्या एकट्याच्या मालकीचें होईल." गांवांत गेलेल्या चोरानें विचार केला कीं, "त्या धनाचे दोन भाग होण्यापेक्षां तें सर्व आपणालाच मिळालें तर फार चांगलें" परत येतांना त्यानें आपल्या साथीदारासाठीं आणलेल्या जेवणांत तीव्र विष घातलें. तो जवळ आल्याबरोबर पहारा करणाऱ्या चोरानें त्याचीं दोन शकलें केलीं, व स्वतः तें विषमिश्रित अन्न खाऊन मरण पावला !

बोधिसत्त्व एक दोन दिवसांनीं तेथें आला व त्यानें आपल्या गुरूचें मार्गांत पडलेले प्रेत पाहिलें. पुढें वाटेंत चोरांची प्रेतें आढळलीं. तसाच सुगावा काढीत काढीत तो त्या गुहेच्या द्वाराशीं आला, व तेथें घडलेले प्रकार पाहून त्यानें चोरांची वाट कशी झाली याचें अनुमान केलें, आणि हे उद्गार काढले, "आमच्या आचार्यांनीं आपल्या सामर्थ्याचा अकाली उपयोग केल्यामुळें ही अनर्थपरंपरा ओढली ! भलत्याच वेळीं सामर्थ्याचा उपयोग करूं नये हा धडा या गोष्टीपासून शिकला पाहिजे."

बोधिसत्त्वानें ते धन आपल्या घरीं नेलें, व दानधर्म करून सदाचरणानें आयुष्याचा सदुपयोग केला.

# विश्वासघातकी राजा.

## (सच्चंकिर जातक नं. ७३)



काशीच्या राजाला एक मुलगा झाला. लहानपणीं तो हूड असल्यामुळें त्याला दुष्टकुमार हेंच नांव पडलें. राजवाड्यांतल्या सर्व नोकरांना तसाच नगरवासी लोकांना तो फार त्रास देत असे. त्यामुळें सर्वांनीं डोळयांतील खड्याप्रमाणें किंवा आपणाला खाण्यास आलेल्या पिशाच्याप्रमाणें तो अप्रिय झाला होता. एके दिवशीं तो आपल्या नोकराबरोबर जलक्रीडा करण्यासाठी नदीवर गेला. त्याचवेळीं एकाएकीं मोठा पाऊस पडण्यास सुरूवात झाली. सर्व प्रदेशांत अंधकार पसरला. तेव्हां तो आपल्या नोकराला म्हणाला "मला या वेळीं नदींत उतरण्यास मदत करा" त्यांनीं त्याला नदींत नेऊन पूर आला असतां तेथेंच टाकून दिलें, व ते म्हणाले, "असल्या पापी माणसाला येथें सोडून दिलें

तर राजाला त्याची बातमी देखील समजावयाची नाहीं. अरे दरिद्री पोरा, तुझ्या कर्माप्रमाणें तूं जा." नदीवरून परत आल्यावर त्यांना "आपला मुलगा कोठें आहे" असा प्रश्न केला. तेव्हां ते म्हणाले, "महाराज महामेघामुळें आम्हाला कांही दिसेनासें झालें, व आमच्यापूर्वीच नदींतून वर निघून कुमार वाड्यांत आला असावा अशा समजुतीनें आम्हीं मागोमाग धांवत धांवत आलों. पण येथें पहातों तों कुमाराचा पत्ता नाहीं." राजा परिवारासह नदीतीरी गेला व त्यानें तेथें कुमाराचा पुष्कळ शोध केला; पण व्यर्थ ! त्याचा मुळींच पत्ता लागला नाहीं.

इकडे तो राजकुमार पुरांत सांपडून वहात चालला असतां नदींतून येणारें एक झाड त्याच्या हातीं आलें. त्याच्यावर बसून मरणाच्या भयानें आरडत ओरडत तो तसाच नदीच्या ओघानें वहात चालला होता. त्याच नदीच्या कांठी एक सर्प रहात असे. त्याचा पूर्वजन्मींचा इतिहास असा होता कीं, तो एक धनाढ्य व्यापारी होता, व त्यानें चाळीस कोटी कार्षापण जमिनींत पुरून ठेविले होते. त्या धनलोभामुळें या जन्मी साप होऊन तेथे रहात होता. आणखी एक दुसरा व्यापारी त्याच नदीच्या कांठी तीस कोटी कार्षापण पुरून ठेवून या जन्मीं उंदीर झाला होता, व तो त्या ठेव्यावर आपलें बीळ करून रहात होता. त्या दोन्ही प्राण्यांच्या बिळांत पाणी शिरल्यामुळें ते बाहेर पडले, व नदीच्या पुरांत सांपडून वहात चालले. राजकुमार बसलेल्या झाडाचा त्यांनांहि आश्रय मिळाला. त्या दोघांनीं त्या झाडाच्या दोन टोकांवर आरोहण केलें. तिसरा एक पोपट त्याच नदीकाठी सांवरीच्या झाडावर घरटें करून रहात असे. नदीच्या वेगानें तो वृक्ष उन्मळून नदींत पडला, व बिचाऱ्या पोपटाचें घरटें नदींत बुडालें. पोपट कसाबसा आपल्या घरट्यांतून बाहेर निघाला; पण पाण्यानें पंख भिजल्यामुळें व पाण्यांत गुदमरल्यामुळें त्याला उडतां येईना. राजकुमार बसलेलें झाड वहात येत असतां जीव रक्षणाच्या कामीं त्यालाहि उपयोगीं पडलें. तो एका लहानशा फांदीवर बसून राहिला.

आमचा बोधिसत्त्व त्याकाली औदिच्य ब्राह्मण कुलांत जन्मला होता. वयांत आल्यावर प्रपंचांत दोष दिसून आल्यामुळें गृहस्थाश्रम न स्वीकारितां त्यानें अरण्यवास पत्करिला. याच नदीच्या कांठीं तो आपला आश्रम बांधून रहात असे. मध्यरात्रींच्या सुमारास राजपुत्राचा आक्रोश ऐकून बोधिसत्त्वाला त्याची कींव आली, व तो म्हणाला, "हे पुरुषा, तूं रडूं नकोस. मी या संकटांतून तुला पार पाडतों." बोधिसत्त्व पोहण्यांत अत्यंत पटाईत होता. त्यानें त्या महापुरांत उडी टाकून

राजपुत्राला झाडासकट तीरावर आणलें. व पहातो तों त्याला त्या झाडावर असलेले सर्पादिक तीन प्राणी आढळले. राजपुत्राला आणि त्या प्राण्यांना त्यानें आपल्या आश्रमांत नेलें. ते सगळे हवेनें व पावसानें गारठून गेले होते. त्यांच्या अंगी मुळींच त्रास राहिलें नव्हतें. त्यांतल्या त्यांत राजकुमाराला इतरांइतकी इजा झाली नव्हती म्हणून तापसानें प्रथमतः त्या मुक्या प्राण्यांस आपल्या अग्निकुंडाजवळ नेऊन ठेविलें व नंतर राजकुमाराला आपल्या वस्त्रांनीं पुसून काढून दुसरी वस्त्रे परिधान करण्यास देऊन आगीजवळ बसविलें. पुढें त्यांच्या अंगीं थोडी ताकत आल्यावर साप, उंदीर आणि पोपट या तिघांना त्यानें थोडें थोडें खाऊं घातलें, व नंतर राजकुमाराला आश्रमांत असलेले फलमूलादिक जिन्नस खावयास दिले. पण हें त्याचें कृत्य राजकुमारास मुळीच आवडलें नाहीं. तो मनांतल्या मनांत म्हणाला, "हा तापस अत्यंत नीच आहे. मी या प्रदेशाच्या राजाचा मुलगा असून माझा समाचार प्रथमतः न घेतां, हा क्षुद्र प्राण्यांची शुश्रूषा करीत आहे. या मूर्खाला माझी योग्यता मुळींच समजत नाहीं. यदाकदाचित् मी वाराणशीचा राजा झालों, तर या जोगड्याचा चांगला समाचार घेतल्यावांचून राहणार नाहीं."

कांहीं दिवस राजकुमार आणि ते तीन प्राणी बोधिसत्त्वाच्या आश्रमांत राहिले, व पाऊस कमी झाल्यावर आणि अंगीं ताकत आल्यावर तेथून आपापल्या ठिकाणी जावयास निघाले. जातांना सर्प बोधिसत्त्वाला म्हणाला, "तापसमहाराज, तुम्ही माझ्यावर फार मोठा उपकार केला आहे. तो सर्वस्वी जरी मला फेडतां येणें शक्य नाही, तथापि मी भिकारी नाहीं. माझ्या बिळाजवळ पूर्वजन्मी पुरून ठेविलेलें पुष्कळ धन आहे. जर तुम्हाला त्या धनाचा उपयोग होण्यासारखा असेल, तर तुम्ही माझ्या बिळाजवळ येऊन मला हे सर्पा अशी हांक मारा म्हणजे मी तुम्हास ती जागा दाखवून देईन." असें बोलून व आपल्या बिळाची जागा कोणत्या ठिकाणीं हें बोधिसत्त्वाला समजावून देऊन सर्प तेथून निघून गेला.

नंतर उंदीर पुढें येऊन म्हणाला, "महाराज आपले उपकार मी कधींही विसरणार नाहीं. पूर्वजन्मी ३० कोटी कार्षापण मी गाडून ठेविले आहेत. या धनानें जर तुमच्या उपकाराची थोडीबहुत फेड होण्यासारखी असेल, तर तें सर्व मी तुम्हास देण्यास तयार आहे. तुम्ही माझ्या बिळाजवळ येऊन मला उंदीर म्हणून हांक मारा म्हणजे मी तुम्हाला माझा ठेवा दाखवून देईन." असें बोलून व आपला पत्ता बोधिसत्त्वाला सांगून तोही सर्पाच्या मागोमाग निघून गेला.

तेव्हां पोपट म्हणाला, "महाराज, माझ्याजवळ धनद्रव्य कांहीं नाहीं. पण तुम्हाला जर तांदुळांची जरून लागेल तर माझ्या रहाण्याच्या जागीं येऊन मला पोपटा म्हणून हाक मारा. मी आपल्या जातभाईंना सांगून हिमालयांतून उत्तम साळीचीं कणसें वाटेल तेवढीं तुम्हाला आणून देत जाईन." आपला पत्ता सांगून तोहि तेथून उडून गेला.

तदनंतर दुष्ट राजकुमार म्हणाला, "भदंत, मी जर राजा झालों, तर तुम्ही वाराणसीला या. मी तुमची सर्व व्यवस्था लावून देईन. व तुम्हाला मोठ्या सत्कारानें माझ्या राज्यांत ठेऊन घेईन." असें सांगून तोहि आपल्या राजधानीला गेला.

पित्याच्या मरणानंतर या राजकुमाराला गादी मिळाल्याचें वर्तमान बोधिसत्त्वाला समजलें. तेव्हां त्याची आणि त्याजबरोबर सर्प, उंदीर आणि पोपट या सर्वांची परीक्षा पाहण्यासाठीं तो आश्रमांतून निघाला, व प्रथमतः सर्प रहात होता त्या ठिकाणीं आला. सर्पा, म्हणून हाक मारल्याबरोबर बोधिसत्त्वाचा शब्द ओळखून सर्प बिळांतून बाहेर पडला, व नमस्कार करून बोधिसत्त्वाला म्हणाला, "भदंत, या ठिकाणीं चाळीस कोटी कार्षापण आहेत. ते आपल्या सवडीप्रमाणें घेऊन जा."

बोधिसत्त्व म्हणाला, "ठीक आहे. जेव्हां मला गरज पडेल, तेव्हां या गोष्टीचा विचार करितां येईल. सध्यां तूं येथेंच रहा."

सर्पाला मागें फिरवून बोधिसत्त्व उंदीराजवळ गेला, व त्याला हाक मारून त्यानें बाहेर आणिलें. सर्पाप्रमाणें उंदिरानेंहि बोधिसत्त्वाचें उत्तम आदरातिथ्य केलें, व आपल्याजवळ असलेलें धन घेऊन जाण्यास विनंती केली. त्याला तेथेंच राहण्यास सांगून बोधिसत्त्व पोपटाजवळ गेला.

बोधिसत्त्वाला पाहून पोपट झाडाच्या अग्रावरून खालीं उतरला व नमस्कार करून म्हणाला, "भदंत, तुम्हाला उत्तम तांदुळाची गरज असेल, तर माझ्या जातभाईंबरोबर हिमालयावर जाऊन मी तेथें आपोआप वाढणाऱ्या साळींची कणसें घेऊन येतों."

बोधिसत्त्व म्हणाला, "तुमच्याबरोबर माझ्या आश्रमांत आलेला राजकुमार आतां या राष्ट्राचा राजा झाला आहे. त्याला भेटण्यासाठीं मी जात आहे. सध्यां मला तांदुळाची गरज नाहीं. पुढें पाहतां येईल."

पोपटाचा निरोप घेऊन बोधिसत्त्व वाराणसीला गेला. त्या दिवशी राजाच्या उद्यानांत राहून दुसऱ्या दिवशीं स्नान वगैरे करून भिक्षेसाठी नगरांत फिरूं लागला. त्यावेळीं तो दुष्ट राजा हत्तीच्या अंबारींत बसून नगर प्रदक्षिणेला निघाला होता. बोधिसत्त्वाला पाहून त्याचें पित्त खवळलें. तो मनांतल्या मनांत म्हणाला, "हा पाजी तापस खाऊन खाऊन लठ्ठ होण्यासाठीं मजपाशीं आला आहे. त्याला याच्या दुष्टपणाचें प्रायश्चित्त ताबडतोब दिले पाहिजे नाहीं तर आपण केलेले उपकार लोकांना सांगून तो माझ्याविषयीं त्यांची मनें कलुषित करील." आपल्या नोकरांकडे वळून तो म्हणाला, "सेवक हो, हा दुष्ट तापस माझ्यापासून कांहीं तरी लाभ व्हावा म्हणून माझ्यामागें घिरट्या घालीत आहे; पण या भिकारड्याचें तोंड देखील मी पाहूं इच्छित नाहीं. याला येथून एकदम घेऊन जा, व प्रत्येक चौकांत फटके मारून शहराच्या बाहेर नेऊन याचा शिरच्छेद करा."

राजाच्या तोंडांतून शब्द बाहेर पडण्याचा अवकाश- त्या सेवकांनी कांहीं एक विचार न करितां बोधिसत्त्वाला आपल्या हातांनीं बांधून प्रत्येक चौकांत फटके मारण्यास सुरुवात केली, पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, बोधिसत्त्व आई आई म्हणून न ओरडतां संतोष वृत्तीनें खालील गाथा म्हणत असे--

सच्चं किरेवमाहंसु नरा एकच्चिया इध ।

कट्ठं निप्लवितं न त्वेवेकच्चियो नरो ॥

(अर्थ :- कांही शहाणे लोक म्हणत असत कीं, नदींतून लांकडाला तारलेलें चांगलें; पण तशा एखाद्या माणसाला तारणें चांगलें नाहीं. या त्यांच्या म्हणण्याचा प्रत्यय मला आज येत आहे.)

ती ऐकून बोधिसत्त्वाच्या भोंवती गोळा झालेले कांही शहाणे लोक म्हणाले, "भो तापस, तुझ्या या बोलण्याचें आम्हाला आश्चर्य वाटतें. तुझा आणखी आमच्या राज्याचा कांहीं संबंध आहे काय ?"

बोधिसत्त्वानें राजा तरुणपणीं प्रवाहांत सांपडून वहात जात असतां आपण त्याला कसें वांचविलें इत्यादि वर्तमान त्यांस सांगितलें. दुष्ट कुमार लहानपणीं प्रवाहांत सांपडला होता ही गोष्ट नागरिकांना माहीत होती. तेव्हां तपस्व्याचें बोलणें त्यांना पटलें, व ते परस्परांला म्हणाले, "अशा तऱ्हेच्या धैर्यशाली मनुष्याला कांहीं एक दोष नसतां आमचा हा मूर्ख राजा मारूं पहात आहे. अशा कृतघ्न राजाचा आश्रय केल्यानें आमच्या राष्ट्राची वृद्धि कशी होईल. याचक्षणी त्याला धरून या तापसाच्या ऐवजीं ठार मारणें योग्य होईल." सर्व नागरिक राजाच्या दुर्वर्तनाला कंटाळलेच होते. यावेळीं त्यांचा क्षोभ इतका तीव्रे झाला कीं, त्यांनीं प्रदक्षिणा करणाऱ्या आपल्या राजाला अंबारींतून खालीं ओढून रस्त्यांतच त्याचा वध केला, व बोधिसत्त्वाला बंधनमुक्त करून गादीवर बसविलें. त्यानें राज्याची व्यवस्था धर्मन्यायानें लाविलीं. तथापि, दुष्ट राजाच्या अव्यवस्थेमुळें राष्ट्रांत पैशाची फार टंचाई पडली होती. पण बोधिसत्त्वाच्या मित्रांनीं- सर्पानें आणि उंदरानें- आपल्या संग्रहीं असलेलें धन देऊन ती भरून काढिली. त्या दोघांना आणि पोपटाला बोधिसत्त्वानें वाराणसी नगरींत आणून ठेविलें. आपल्याच राजवाड्यांत त्यानें सर्पासाठीं एक सोन्याचें बीळ तयार केलें होतें; उंदिरासाठीं स्पटिकमण्याची गुहा केली होती; व पोपटाला एका सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेविलें होतें. त्या तीनहि प्राण्यांनीं आजन्म बोधिसत्त्वावरील आपलें प्रेम एक रतीभरही कमी केलें नाहीं.

# एकी असेल तेथें वास्तव्य करावें.

## (रुक्खधम्म जातक नं. ७४)



चार दिक्पालांपैकीं वैश्रवण आपल्या पुण्यक्षयामुळें देवलोकांतून पतन पावला. त्याच्या जागीं इंद्रानें दुसऱ्या वैश्रवणाची योजना केली. त्यानें सगळ्या देवतांना आपआपल्या इच्छेप्रमाणें वसति करून रहावें असा निरोप पाठविला. आमचा बोधिसत्त्व त्या काळीं हिमालयाच्या पायथ्याशीं रहाणाऱ्या देवतांच्या कुलांत जन्मला होता. त्यानें जवळच्या एका दाट शालवनाचा आश्रय केला, व आपल्या ज्ञातिबांधवांना तेथेंच रहाण्यास उपदेश केला. पण कांहीं जणांना बोधिसत्त्वाचें बोलणें पटलें नाहीं. त्या देवता म्हणाल्या "येथें या अरण्यांत राहिल्यानें लोकांकडून आदरसत्कारपूर्वक मिळणाऱ्या बळीला आम्हीं मुकू. गांवोगांवीं वडासारखे मोठमोठाले वृक्ष आहेत. तेथें जाऊन आम्हीं

निरनिराळ्या झाडांचा आश्रय केला असतां लोकांकडून आमचा गौरव होईल, व अन्नपाण्याची ददात पडणार नाहीं."

बोधिसत्त्व त्यांचे समाधान करूं शकला नाहीं. त्या निरनिराळ्या गांवीं जाऊन राहिल्या. काहीं निवडक देवता मात्र त्याच शालवनाचा आश्रय धरून राहिल्या. कांहीं दिवसांनीं भयंकर तुफान होऊन मोठमोठालें वृक्ष उन्मळून पडले. व त्यामुळें गांवोगांवीं एकाकी वृक्षांवर वास करून राहणाऱ्या देवतांचें फार नुकसान झालें. त्या तशा स्थितींत निवासस्थान न मिळाल्यामुळें पुनः बोधिसत्त्व रहात होता त्या ठिकाणीं आल्या, आणि पहातात तों त्या वनाला मुळींच धोका पोहोंचला नव्हता. तेव्हां त्या बोधिसत्त्वाला म्हणाल्या, "आम्हीं मोठमोठ्या वृक्षांचा आश्रय केला होता; पण त्यापैकीं कांहीं समूळ उपटून पडले, काहींच्या शाखा छिन्नभिन्न झाल्या व दुसरे वृक्ष वर पडल्यामुळें कांहींची फार नासाडी झाली. यामुळें आम्हीं निराश्रित होऊन येथें परत आलों; परंतु तुमच्या या लहान सहान शालवृक्षांनीं भरलेल्या वनाला मुळींच धोका पोहोंचला नाहीं."

बोधिसत्त्व म्हणाला, " बांधवहो, आमचें हें शालवन जरी मोठ्या वृक्षांनीं मंडित केलें नाहीं, तथापि येथें शालवृक्षांची इतकी दाटी आहे कीं जणूं काय ते एकमेकांच्या हातांत हात घालूनच रहात आहेत. जेथें अशी एकी आहे तेथें मोठमोठाल्या वृक्षांनां जमीनदोस्त करणाऱ्या पराक्रमी वायुवेगाचें तरी काय चालणार आहे ! या एकीचें बळ पाहूनच मी या वनाचा आश्रय केला. पण तुम्ही लोभवश होऊन मोठमोठ्या वृक्षांच्या मागें लागला."

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठानच्या पुस्तक खजिन्यात सातत्याने नवनवीन भर पडत असते. आपण पहाता ना? नवीन सुमारे तीस पुस्तकं लवकरच येत आहेत. एकाहून एक भारी. सगळीच तुम्हाला हवी असतील तर संपर्कात रहा. VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

## आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान